राज्यातील विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना सन २०२३- २४ मध्ये परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-शिवृत्ती-२०२३/प्र.क्र.६३/शिक्षण-२**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १२ मार्च, २०२४.

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०१८/प्र.क्र.११८/ शिक्षण, दिनांक ११.१०.२०१८.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२१/प्र.क्र.३५/ शिक्षण-२, दिनांक ११.१०.२०२२.
३) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.२८/ शिक्षण-२, दिनांक ३०.०८.२०२३.
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. इबीसी २०२३/प्र.क्र.६०(४)/ बांधकामे, दि.३०.१०.२०२३.

**प्रस्तावना :-**

राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील १० गुणवंत मुला-मुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी राज्यशासनामार्फत शिष्यवृत्ती देण्याची योजना शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ दिनांक ११.१०.२०१८ अन्वये मंजूर करण्यात आली आहे. तद्नंतर शासन निर्णय संदर्भ क्रमांक २ दिनांक ११.१०.२०२२ अन्वये परदेश शिष्यवृत्ती धारक विद्यार्थी संख्येत १० वरुन ५० इतकी वाढ करण्यात आलेली आहे.

उक्त निर्णयानुसार राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील ५० गुणवंत मुला-मुलींना सन २०२३-२४ मध्ये परदेशात उच्च शिक्षणासाठी शासन निर्णय संदर्भ क्र. ३ दिनांक ३०.०८.२०२३ अन्वये परदेश शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आली आहे.

शासनाचे विविध विभाग/उपक्रम/महामंडळे यांच्या मार्फत परदेशात उच्च शिक्षणासाठी दिल्या जाणाऱ्या शिष्यवृत्तीचे निकष एकसारखे असावेत यासाठी शिफारस करण्यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०३.५.२०२३ रोजी समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीमार्फत विविध विभागांमार्फत विद्यार्थ्यानां देण्यात येणाऱ्या परदेश शिष्यवृत्ती योजनांसाठी सर्वकंष एकसमान धोरण तयार करण्याची शिफारस करण्यात आली होती. त्यानुषंगाने दिनांक १९.१०.२०२३ रोजीच्या मा. राज्य मंत्रीमंडळाच्या बैठकीत राज्यशासनाच्या ज्या ज्या विभागामार्फत विविध प्रवर्गातील विद्यार्थ्यांना परदेशात उच्च शिक्षणासाठी परदेश शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येते. त्या सर्व विभागास एकसमान धोरण म्हणून विद्यार्थी संख्या ७५ करण्यात आली आहे. मा.मंत्रीमंडळाच्या उक्त निर्णयास अनुसरुन सामाजिक

न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत निर्गमित करण्यात आलेल्या सर्वसमावेशक शासन निर्णय संदर्भ क्रमांक ४ दिनांक ३०.१०.२०२३ अन्वेय राज्यातील विविध प्रशासकीय विभागातील परदेश शिष्यवृत्ती धारक विद्यार्थी संख्या ५० वरुन ७५ करण्यात आली आहे.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयातील तरतूदीनुसार इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत शासन निर्णय दि. ३०.०८.२०२३ अन्वेय सन २०२३-२४ मध्ये विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील परदेश शिष्यवृत्ती मंजूर केलेल्या ५० विद्यार्थी संख्या ७५ करण्याच्या अनुषंगाने प्रतिक्षायादीतील शाखा/अभ्यासक्रम निहाय गुणानुक्रमानुसार २५ पात्र विदयार्थ्यांना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना सन २०२३-२४ मध्ये परदेशात उच्च शिक्षणासाठी शासन निर्णय संदर्भ क्र.३ दि. ३०.०८.२०२३ अन्वये शिष्यवृत्ती मंजूर केलेल्या ५० विद्यार्थ्यांची संख्या शासन निर्णय संदर्भ क्र. ४ मधिल निर्णयानुसार ७५ करण्याच्या धोरणात्मक निर्णयानुसार या शासन निर्णया सोबतच्या **"प्रपत्र-अ"** मध्ये नमूद २५ पात्र विदयार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर व विद्यार्थी संख्या ५० वरुन ७५ करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त प्रमाणे निवड करण्यात येणाऱ्या २५ विद्यार्थ्यांची निवड ही त्यांनी अर्जासोबत सादर केलेल्या जात प्रमाणपत्र, जात पडताळणी प्रमाणपत्र, सन २०२२-२३ या वर्षाचे उत्पन्नाचे प्रमाणपत्र, महाराष्ट्र राज्याचा रहिवासी असल्याचा दाखला इत्यादी कागदपत्रांची व अनुषंगिक इतर बाबींची पडताळणी संबंधित प्रादेशिक उपसंचालक यांच्याकडून गृह चौकशीव्दारे करण्याच्या अटीस अधिन राहून करण्यात येत आहे. निवड झालेले संबंधित विद्यार्थी संदर्भ क्रमांक ४ दिनांक ३०.१०.२०२३ च्या शासन निर्णयामधील सर्व अटी व शर्तीच्या पूर्ततेच्या अधीन परदेश शिष्यवृत्तीसाठी पात्र राहतील.

३. परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्याला अनुज्ञेय शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी संबंधित प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांकडून संदर्भाधीन दि.३०.१०.२०२३ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार विहीत करण्यात आलेली हमीपत्रे, तसेच विद्यार्थ्यांच्या मूळ कागदपत्रांची तपासणी करूनच संबंधित विद्यार्थ्यास अनुज्ञेय शिष्यवृत्ती वितरीत करण्याचा प्रस्ताव संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचेमार्फत संबंधित प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी शासनास सादर करावा.

५. ज्या विद्यार्थ्यास शासनामार्फत परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर केली आहे, त्या विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण संपल्यानंतर देशाची सेवा करणे व त्यांच्या ज्ञानाचा फायदा देशाला करुन देणे आवश्यक आहे. या अनुषंगाने संबंधित विद्यार्थ्याकडून शिष्यवृत्ती मंजूर करण्यापूर्वी हमीपत्र (BOND) लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. परदेशात उच्च शिक्षणाकरीता शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांनी परदेशातील पदव्युत्तर पदवी किंवा पीएचडी अभ्यासक्रम विहित कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यासाठी कोणत्याही परिस्थितीत विद्यार्थ्यास मुदतवाढ वा वाढीव खर्च दिला जाणार नाही.

७.    परदेश शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या संबंधित विद्यार्थ्यास उच्च शिक्षण घेण्यासाठी ज्या शैक्षणिक संस्थेत / विद्यापीठात अथवा अभ्यासक्रमास मान्यता दिलेली आहे, ते ठिकाण वा अभ्यासक्रम विद्यार्थ्याने परस्पर बदलल्यास संबधित विद्यार्थ्याकडून शिष्यवृत्तीची रक्कम संपूर्णतः वसूल करण्यात येईल.

८.    शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या एकूण खर्चाच्या रकमेपैकी ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर झाली आहे, त्याला त्या वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च यांची रक्कम संबंधित प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी विद्यार्थी प्रवेशित विद्यापीठाकडून प्रमाणित माहितीसह प्राप्त करून घेऊन अनुज्ञेय शिक्षण फी संबंधित विद्यापीठाच्या बँक खात्यात आणि निर्वाह भत्ता व अनुषंगिक खर्चाची रक्कम नियमानुसार संबंधित विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात वर्ग करावी.

९.    सन २०२३-२४ करीता परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती करीता निवड केलेल्या पात्र विदयार्थ्यांची यादी ही दि.३१.०३.२०२४ किंवा सन २०२४-२५ ची पुढील वर्षाची परदेशी शिष्यवृत्तीची प्रक्रिया सुरु करेपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंतच ग्राहय राहील.

१०.    याबाबत होणारा खर्च हा मागणी क्रमांक झेडजी ०३ (०२) (१८) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परेदशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती (२२२५ एफ २१८), या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्या अंतर्गत चालू आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

११.    याबाबी वरील खर्चासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तसेच संबंधित प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१२.    सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.०५/२०२४/व्यय-१४, दि. १६.०२.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत.

१३.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३१३१०५८०८३३३४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल याच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: CN = KAILAS TARACHAND SALUNKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2024.03.13 11:11:19 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**सोबत :- प्रपत्र-अ**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा.मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई.
११) प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
१३) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१४) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१६) उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (प्रादेशिक) (सर्व)
१७) सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (सर्व)
१८) लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१९) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) निवडनस्ती (शिक्षण-२).

शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.६३/शिक्षण-२, दि. १२ मार्च,२०२४ चे सहपत्र

प्रपत्र -(अ)

सन २०२३-२४ करिता विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गतील विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती - निवड यादी

| अ.क्र. | विद्यार्थ्यांचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव व देशाचे नाव | विद्यापीठाच्या देशाचे नाव | वर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अभियात्रिकी | | | | |
| १ | आयुषी अरविंद धांदे (चंद्रपूर) | The University of Queensland | Australia | २ वर्ष |
| २ | दत्तात्रय अनिलराव सिरस्कर (नागपूर) | University of Queensland | Australia | २ वर्ष |
| ३ | खुशबू प्रमोद झोपे (ठाणे) | UNSW Sydney | Australia | २ वर्ष |
| ४ | कौस्तुभ दिलीप खोडके (नागपूर) | Delft University of Technology | Netherlands | २ वर्ष |
| ५ | सागर दत्तात्रय वाघ (पुणे) | Washington University in St.Louis | United States | १ वर्ष ५ महिने |
| ६ | प्रार्थना प्रशांत डाखुळे (नागपूर) | University of Birmingham | United Kingdom | १ वर्ष |
| ७ | श्रीगंधर्व संजय गायकवाड (पुणे) | University of Southern California | United States | २ वर्ष |
| ८ | सुयश संजय यादव (पुणे) | University of Birmingham | United Kingdom | १ वर्ष |
| ९ | प्राची सुनिल व्हरकल (पुणे) | The University of Sydney | Australia | २ वर्ष |
| १० | पूर्वा नंदकिशोर मेस्त्री (मुंबई) | University of leeds | England | १ वर्ष |
| ११ | विश्वजीत भालचंद्र होळकर (पुणे) | RWTH Aachen University | Germany | २ वर्ष |
| १२ | इंद्रनिल चंद्रशेखर आंबेकर (अमरावती ) | Technische University Berlin | Germany | २ वर्ष |
| १३ | श्वेता संजय गिरी (पुणे) | University of Liverpool | United Kingdom | २ वर्ष |
| १४ | अभिषेक अनिल आव्हाड (नाशिक) | University of Maryland's college park | United States | २ वर्ष |
| १५ | जय राजेंद्र सतंगे (नागपूर) | University of Florida | United States | २ वर्ष |

| सन २०२३-२४ करिता विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गतील विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती - निवड यादी | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विद्यार्थ्यांचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव व देशाचे नाव | विद्यापीठाच्या देशाचे नाव | वर्ष |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| व्यवस्थापन | | | | |
| १६ | प्रतिक्षा प्रशांत बागुल (नाशिक) | Queen'Mary University of London | London | १ वर्ष |
| १७ | रिषभ ओमप्रकाश चव्हाण (कोकण) | University Of York | England | १ वर्ष |
| १८ | जयसिंग नंदकिशोर जगताप (अमरावती | Case western Reserve University | United States | २१ महिने |
| १९ | चक्रवार प्रकाश पाटील (नाशिक) | University of Birmingham | United Kingdom | १ वर्ष |
| २० | मिहीर पवन गिरडकर (नागपूर) | University fo Leeds | England | १ वर्ष |
| कला | | | | |
| २१ | धनंजय करवीर ठाकरे (अमरावती) | London School Of Economics And Political Science | United Kingdom | ९ महिने |
| २२ | निकिता तुषार पाटील (नाशिक) | University of Birmingham | United Kingdom | १ वर्ष |
| विज्ञान | | | | |
| २३ | जयंत देवेंद्र महाकाळकर ( नागपूर) | Wageningen University & Research | Netherlands | २ वर्ष |
| २४ | रितिका राजाराम जाधव (सातारा) | The university of Manchester | United Kingdom | १ वर्ष |
| २५ | महेश जिभाऊ कापडणीस (नाशिक) | University of Leeds | England | १ वर्ष |

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: CN = KAILAS TARACHAND SALUNKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2024.03.13 11:11:38 +05'30'

(कैलास साळुंके)

उप सचिव,महाराष्ट्र शासन